राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वरळी येथे अतिदक्षता विभाग सुरु करण्यासाठी स्थापत्य दुरुस्तीकरीता रुपये ३४,९९,७८१/- इतक्या रक्कमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राकायो-२०१८/प्र.क्र.१४२/राकावि-२

नविन मंत्रालय, गोकूळदास तेजपाल रुग्णालय, संकूल इमारत
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई.
दिनांक : १५ जून, २०१८.

वाचा -

१) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक.१७.०४.२०१५

२) संचालक (वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/का.क्र.०९/ Civil अंदाजपत्रक/वरळी रुग्णा./२५५३-५४/२०१८, दिनांक २३.०२.२०१८

प्रस्तावना -

संचालक (वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वरळी येथे अतिदक्षता विभाग सुरु करण्यासाठी रुपये २८,७१,३४६/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस लाख एकाहत्तर हजार तीनशे शेहचाळीस फक्त) स्थापत्य दुरुस्तीकरीता प्रशासकीय मान्यतेसाठी शासनाकडे प्रस्ताव सादर केला होता. त्यानुषंगाने राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वरळी येथील अतिदक्षता विभाग सुरु करण्यासाठीच्या स्थापत्य दुरुस्तीकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वरळी, मुंबई येथे अतिदक्षता विभाग सुरु करण्यासाठी करावयाच्या स्थापत्य दुरुस्तीसाठीचे एकूण २८,७१,३४६/- इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारीत आहे. सदर प्रस्तावाच्या छाननीअंती (वस्तु व सेवा कर, आकस्मिक दर व इतर बाबी लक्षात घेता) परिगणनीत करण्यात आलेलया एकूण रुपये ३४,९९,७८१/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर खर्च आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचेकडील उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग पाच मधील अ.क्र.१, नियम क्र.१३४ समोरील अटींचे पालन करण्यात यावे.

३. उपभोक्ता विभागाच्या वतीने सक्षम प्राधिकाऱ्याचे साक्षांकन आवश्यक राहील.

३. सदर अंदाजपत्रकाच्या कामासाठी निधी उपलब्ध नसल्यास कामासाठी लागणाऱ्या रक्कमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

४. हा खर्च खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा.

**मागणी क्र.आर-१**

**मुख्य लेखाशिर्ष -**

२२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१ - नागरी आरोग्य सेवा विषम चिकीत्सा

१०२ - राज्य कामगार विमा योजना

(०१)(०३) वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रुग्णालये

(२२१० १४०२) २७ - लहान बांधकामे.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग पाच मधील अ.क्र.१, नियम क्र.१३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१५१२११५०९८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2018.06.15 15:29:43 +05'30'

**संजय रा.मोरे**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना,मुंबई.

२. संचालक (वैद्यकीय) / (प्रशासन) राज्य कामगार विमा योजना, मुंबई .

३. वैद्यकीय अधिक्षक ,राज्य कामगार विमा योजना रुग्णालय , वरळी.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. उप अभियंता, बांधकाम (सा.बां.), उपविभाग क्र.१, वरळी, मुंबई-१८.
८. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई-१८.
९. अवर सचिव, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती (राकावि-२).